**वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ नुसार राज्यातील "कापुस उत्पादक तालुके" घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः धोरण १०१८/प्र.क्र.४०/टेक्स १ (अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
तारीख: २८ ऑगस्ट, २०१८.

वाचा :-

१) **शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः धोरण २०१७/प्र.क्र.६/टेक्स-५, दिनांक १५ फेब्रुवारी, २०१८.**

प्रस्तावना :-

वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ दि.१५ फेब्रुवारी, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये जाहिर करण्यात आले आहे. सदर धोरणानुसार सहकारी तत्वावर चालविण्यात येणाऱ्या सूतगिरण्यांकरीता शासकीय भागभांडवलाची योजना ही फक्त कापूस उत्पादक जिल्हयामध्ये राबविण्यात येणार आहे. ज्या तालुक्यांमध्ये उत्पादित होणाऱ्या कापसापैकी ५० % पेक्षा कमी कापूस सूतगिरण्यांसाठी वापरला जातो, फक्त अशास तालुक्यात सदर योजना राबविण्यात येणार आहे.

सर्वसाधारणपणे २५२०० चात्या पूर्ण क्षमतेने सुरु असणाऱ्या सहकारी सूतगिरणीस वर्षाला किमान २८८०० गाठी (१ गाठ म्हणजे १७० किलो कापूस) आवश्यक असतो. २८८०० गाठी कापूस म्हणजे सर्वसाधारणपणे ४८९६ टन इतका कापूस होतो म्हणजेच सूतगिरणीसाठी वार्षिक किमान ४८९६ टन इतक्या कापसाची आवश्यकता असते. ज्या ठिकाणी नव्याने सूतगिरणी स्थापन होणार आहे असा सूतगिरणी प्रकल्प यशस्वी होण्यासाठी दुप्पट म्हणजेच किमान ९६०० टन कापसाची उपलब्धता असणे आवश्यक आहे, या बाबीचा विचार करुन राज्यातील कापूस उत्पादक तालुके घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती त्यानुसार शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

एखादया तालुक्यात सहकारी सूतगिरणी स्थापन करण्यासाठी वार्षिक किमान ४८०० टन कापूस उत्पादन असणे आवश्यक आहे या बाबीचा विचार करता यापुढे भविष्यात स्थापन होणारी सहकारी सूतगिरणी सक्षमपणे चालण्यासाठी ज्या तालुक्यात वार्षिक किमान ९६०० टन कापूस उत्पादन होत आहे असे तालुके यापुढे, "कापूस उत्पादक तालुके" म्हणून घोषित करण्यात येत आहेत. सदर तालुक्यांची जिल्हा निहाय यादी पुढील प्रमाणे आहे :-

| अ.क्र. | जिल्हाचे नांव | कापूस उत्पादक तालुके | तालुक्यांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | **नाशिक** | मालेगाव, नांदगांव, येवला | ३ |
| २ | **धुळे** | धुळे, शिरपूर, सिंदखेडा | ३ |
| ३ | **नंदुरबार** | नंदुरबार, शहादा | २ |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | **जळगांव** | जळगांव, भुसावळ, बोधवड, यावल, रावेर, मुक्ताईनगर, अमळनेर, चोपडा, एरंडोल, धरणगांव, पारोळा, चाळीसगांव, जामनेर, पाचोरा, भडगांव | १५ |
| ५ | **अहमदनगर** | शेवगांव | १ |
| ६ | **औरंगाबाद** | औरंगाबाद, फुलंब्री, पैठण, गंगापूर, वैजापूर, कन्नड, खुलताबाद, सिल्लोड, सोयगांव | ९ |
| ७ | **जालना** | भोकरदन, जालना, बदनापूर, अंबड, घनसावंगी, परतूर, मंठा | ७ |
| ८ | **बीड** | बीड, माजलगांव, केज, परळी, वडवणी | ५ |
| ९ | **नांदेड** | कंधार, लोहा, हदगांव, हिमायतनगर, भोकर, किनवट, माहूर | ७ |
| १० | **परभणी** | परभणी, गंगाखेड, सोनपेठ, पाथरी, जिंतूर, सेलू | ६ |
| ११ | **हिंगोली** | औंढा, कळमनुरी | २ |
| १२ | **बुलढाणा** | जळगांव जामोद, संग्रामपूर, देऊळगांव राजा, सिंदखेड राजा, खामगांव, मलकापुर, मोताळा, नांदूरा | ८ |
| १३ | **अकोला** | अकोट, तेल्हारा, बाळापूर, पातूर, अकोला, बार्शी टाकळी, मुर्तीजापूर | ७ |
| १४ | **अमरावती** | चांदूर रेल्वे, धामणगांव, तिवसा, मोर्शी, वरुड, दर्यापूर, अंजनगांव, अचलपूर, चांदूर बाजार | ९ |
| १५ | **यवतमाळ** | यवतमाळ, कळंब, दारव्हा, अर्णी, पुसद, उमरखेड, मोहगांव, वणी, मारेगाव, झरी जामणी, केळापूर, घाटंजी, राळेगांव | १३ |
| १६ | **वर्धा** | आर्वी, कारंजा, आष्टि, वर्धा, सेलू, देवळी, हिंगणघाट, समुद्रपूर | ८ |
| १७ | **नागपूर** | नागपूर ग्रामीण, हिंगणा, पारशिवणी, नरखेड, कळमेश्वर, उमरेड | ६ |
| १८ | **चंद्रपूर** | वरोरा, भद्रावती, राजुरा, कोरपणा | ४ |
| | | **एकूण** | ११५ |

२. उपरोक्त तक्त्यात नमुद केलेल्या ११५ कापुस उत्पादक तालुक्यात, सद्यस्थितीत कार्यरत असणाऱ्या सहकारी सूतगिरणी शिवाय नव्याने सहकारी सूतगिरणी स्थापन करतांना ज्या तालुक्यात ५० % पेक्षा जास्त किंवा ५००० टनांपेक्षा जास्त कापूस उपलब्ध असेल असा तालुका नवीन सहकारी सूतगिरणी स्थापित करण्यासाठी पात्र समजण्यात येईल.

३. ज्या तालुक्यांत कापसाचे ९६०० टनांहून अधिक उत्पादन सलग २ वर्ष होईल अशा तालुक्यांचा समावेश दरवर्षी आढाव्यानंतर “कापुस उत्पादक तालुक्यांच्या” यादीत करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२८१२२६०३४१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishal Vishvas Madane

Digitally signed by Vishal Vishvas Madane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-op Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, cn=Vishal Vishvas Madane
Date: 2018.08.28 12:29:05 +05'30'

**( विशाल मदने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ३२,
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
६) महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
७) सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक,
८) प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक,
९) कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
१०) कार्यासन अधिकारी, १६-सी, १७-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
११) वित्त विभाग, व्यय-२ / अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-३२,
१२) नियोजन विभाग, कार्यासन-१४३१, मंत्रालय, मुंबई-३२,
१३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय,महाराष्ट्र राज्य, नागपूर,
१५) प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, सोलापूर / औरंगाबाद / नागपूर /मुंबई ,
१६) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था,
१७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती),
२०) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई-१,
२१) चेअरमन, सर्व सहकारी सूतगिरण्या (मार्फत संचालक वस्त्रोद्योग, संचालनालय, नागपूर),
२२) निवडनस्ती (टेक्स १ अ / ब).